महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी पदावरील तदर्थ पदोन्नती.

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन आदेश क्रमांकः मविसे-१०१४/प्र.क्र.५६ (ब)/२०१४/आस्था-३,**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.

तारीख ६ सप्टेंबर, २०१४.:

**संदर्भ-**

१) शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१०/प्र.क्र.०१/२०१०/१२, दिनांक ०८.०६.२०१०.

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१०/प्र.क्र.१/१०/१२, दिनांक २१.६.२०१०.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मधील अधिकाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-अ या संवर्गात पीबी-३ वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेडवेतन ५४०० या वेतनश्रेणीत या आदेशान्वये तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती देण्यात येत आहे.

तद्नुषंगाने शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१०/प्र.क्र.०१/ १०/१२ दिनांक ८.६.२०१० आणि शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१०/ प्र.क्र.१/१०/१२, दिनांक २१.६.२०१० नुसार पदोन्नतीने नियुक्तीसाठी विहीत केलेल्या विभागीय संवर्ग संरचना व विभागीय संवर्ग वाटप नियमावली, २०१० मधील तरतूदींच्या अधीन राहून सदर तदर्थ पदोन्नत अधिकाऱ्यांना खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्याचे पदनाम व ठिकाण | **पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण** | **शेरा** |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.व्ही.एल. वरठा,<br>सहायक गट विकास अधिकारी,<br>पंचायत समिती, तलासरी,<br>जि.ठाणे | गट विकास अधिकारी, पंचायत समिती अहेरी, जि.गडचिरोली | रिक्त पदावर |

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्याचे पदनाम व ठिकाण | **पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण** | **शेरा** |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| | | | |
| २. | श्री.के.एस. जाधव,<br>सहायक प्रकल्प अधिकारी (रोजगार), जिल्हा परिषद, रत्नागिरी | गट विकास अधिकारी, पंचायत समिती सोयगांव, जि.औरंगाबाद | रिक्त पदावर |

२. वरील अधिकाऱ्यांना सरळसेवेच्या कोटयावर तात्पुरत्या स्वरुपात, तदर्थ पदोन्नतीने देण्यात आलेली नियुक्ती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

अ) सदर तदर्थ पदोन्नती ११ महिने अथवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होतील, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत राहील. दरम्यानच्या काळात आयोग पुरस्कृत उमेदवार प्राप्त झाल्यास, तदर्थ पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांना पदावनत करण्यात येईल. सदर तदर्थ पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधित अधिकाऱ्याचा कायम स्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

ब) सदर तदर्थ पदोन्नती ही मुंबई उच्च न्यायालयातील याचिका क्रमांक ८४५२/२००४ मध्ये होणा-या निर्णयाच्या अंतिम निकालाच्या अधीन राहील.

क) सदर तदर्थ पदोन्नती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आलेली आहेत, अशा अधिका-यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

ड) वरील अधिकाऱ्यांना तदर्थ पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

इ) सदर तदर्थ पदोन्नती ही त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयाच्या अधीन राहील.

३. संबंधित विभागीय आयुक्त /मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या वरील अधिकाऱ्यांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन, तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधितांना सूचना दयाव्यात. तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

४. तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर १०८२/२५६७/२८ /११, दिनांक ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच तदर्थ पदोन्नतीने दिलेली नियुक्ती रद्द करणेसाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०६१६३०१६१८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bandekar-Deshmukh Sarita Rishi

Digitally signed by Bandekar-Deshmukh Sarita Rishi
DN: CN = Bandekar-Deshmukh Sarita Rishi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.09.06 17:14:44 +05'30'

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सर्व विभागीय आयुक्त.
२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
३. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
५. खाजगी सचिव, मा. मंत्री, (ग्राम विकास )
६. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री,( ग्राम विकास )
७. मा.प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
८. संबंधित अधिकारी (द्वारा : संबधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद)
९. सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन-१२ / कार्यासन-१३/ कार्यासन-१६ब), मंत्रालय, मुंबई
१०. कार्यासन क्रमांक आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
११. कार्यासन, आस्था-३अ, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१२. निवड नस्ती, का.क्र. आस्था-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग